**राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्र विकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी देण्याबाबत. सन २०१६-१७**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नाक्षेवि-२०१७/प्र.क्र.४३/का.९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०१७.

वाचा -

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र: क्षेविका- २०१५/प्र.क्र.७६/ का.९, दि. १८ जून, २०१५.
२) शासन पूरकपत्र,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.५/का.९, दि. ९ मार्च, २०१६.
३) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१६/प्र.क्र. ८९/अर्थसंकल्प-३, दि. २० एप्रिल, २०१६ व दि. ८ फेब्रुवारी, २०१७.
४) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बीयुडी- २०१५/प्र.क्र. ४३ (भाग-३)/ का-७, दि. २० एप्रिल, २०१६.
५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. नाक्षेवि-२०१६/प्र.क्र.१३५/१६/का-९, दि. २८ डिसेंबर, २०१६.
६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. क्षेविका-२०१६/प्र.क्र.५९/का-९, दि. ६ जानेवारी, २०१७.

प्रस्तावना:-

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील शासन पूरकपत्रान्वये, दि. १८ जून, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील योजनेची कार्यपध्दती या शीर्षाखाली परिच्छेद (ब) (iii) च्या पुढे परिच्छेद दाखल करण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार मा. खासदार व आमदार यांच्या प्रस्तावांना महानगरपालिका/नगरपालिका/नगर परिषद हद्दीमध्ये कामाच्या संख्येची मर्यादा एकापेक्षा जास्त परंतू प्रति काम प्रति वर्षी महानगरपालिकेस कमाल रू. ४० लक्ष, “अ” वर्ग नगरपालिकेस कमाल रू. ३० लक्ष, “ब” व “क” वर्ग नगरपंचायतींना असू शकेल, अशी तरतूद आहे. मा. खासदार, आमदार व जिल्हाधिकारी यांच्याकडून महानगरपालिका/ नगरपालिका/ नगर परिषद यांचे प्राप्त प्रस्तावांना मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

नागरी क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१६-१७ करिता रु. २५.०० कोटी (अक्षरी रू. पंचवीस कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सन २०१६-१७ करिता सदर मंजूर निधीच्या ८० टक्के मर्यादेपर्यंत म्हणजेच रू.२०.०० कोटी पर्यंत निधी वितरीत करण्यासाठी संदर्भ क्र. ३ व ४ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेल्या आहेत. संदर्भ क्र. ५ व ६ येथील शासन निर्णयान्वये एकूण रू.१९,९९,०९,०००/- (अक्षरी रू. एकोणवीस कोटी नव्यान्नव लक्ष नऊ हजार फक्त) निधी वितरीत करण्यात आला आहे. जिल्हाधिकारी, अमरावती यांनी रू.८०,००,०००/-(अक्षरी रू. ऐंशी लक्ष फक्त) निधी प्रत्यार्पित केल्याने सद्यस्थितीत एकूण रू.८०,००,०००/-(अक्षरी रू. ऐंशी लक्ष फक्त) निधी उपलब्ध आहे. तसेच या वर्षात निधी मिळण्यासाठी मा. खासदार, आमदार व जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त राज्यातील विविध महानगरपालिका/नगरपालिका/नगर पंचायत हद्दीतील कामांच्या प्रस्तावांना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत रु.८०,००,०००/- (अक्षरी रू. ऐंशी लक्ष फक्त) एवढा निधी मंजूर करण्यात येत आहे. सदर निधी संबंधित महानगरपालिका /नगरपालिका/ नगरपंचायत ज्या जिल्हयांमध्ये स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

२. संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना मंजूर करण्यात आलेला निधी वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास त्या बदल्यात इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात इतर काम करणे शक्य नसल्यास त्यासाठी वितरीत केलेला निधी शासन जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित महानगरपालिका/नगरपालिका/नगर पंचायत यांना सुपूर्द करण्यात यावा.

३. ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून निधी वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायतींना सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण०२, समाजकल्याण २००, इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक

बहूल क्षेत्रात क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) " या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

५. " वित्त विभागाने सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६ व दि. ८ फेब्रुवारी, २०१७ च्या प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११४०४५२७८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Shashikant R Salunkhe

Digitally signed by Shashikant R Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f496781d7330d61b41c4ca6211158b72d2ab6bf15878cd9312f9d41519ea160, cn=Shashikant R Salunkhe
Date: 2017.03.31 14:06:10 +05'30'

**( श.र.साळुंखे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित विभागीय आयुक्त,
१०.आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११.संबंधित जिल्हाधिकारी,
१२.आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३.मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
१४.मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७.निवडनस्ती.

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि- २०१७/प्र.क्र.४३/का.९,**
**दि. ३१ मार्च, २०१७.**
**परिशिष्ट - "अ"**

**महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम महानगरपालिका / नगरपालिकांचे जिल्हानिहाय निधी वितरणाचे विवरणपत्र.**

| अ.क्र | जिल्हा | म.न.पा./ न.प./न.पा. | कामाचे नांव | मंजूर निधी (रू. लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | मुंबई उपनगर | बृहन्मुंबई म.न.पा. (बोरीवली) | होली मैगी चर्च, गोराई विलेज स्मशानभूमीचे नूतनीकरण | २०.०० |
| | | | गोराई गांव, खजुरा वाडी येथील रोडचे काँक्रीटीकरण | १५.०० |
| | | | पोईसर, बोरीवली पश्चिम येथील दुर्गा कमिटी मस्जिदचे नुतनीकरण | १०.०० |
| | | | पोईसर, बोरीवली पश्चिम येथील कब्रस्थानचे नुतनीकरण | १५.०० |
| | | | मदरसा इ कदलिया अल सुन्नत वल जमात, राजेंद्र नगर, बोरीवली पूर्व, येथे शौचालय | १०.०० |
| | | | मदरसा इ कदलिया अल सुन्नत वल जमात, राजेंद्र नगर, बोरीवली पूर्व, येथे रस्ते व गटार | १०.०० |
| | | | **एकूण (मुंबई उपनगर जिल्हा)** | **८०.००** |
| | | | **अक्षरी रू. ऐंशी लक्ष फक्त** | |

Shashikant R Salunkhe

Digitally signed by Shashikant R Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f496781d7330d61b41c4ca6211158b72d2ab6bf15878cd9312f9d41519ea160, cn=Shashikant R Salunkhe
Date: 2017.03.31 14:06:35 +05'30'

(श.र.साळुंखे)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि-२०१७/प्र.क्र.४३/का.९**
**दि. ३१ मार्च, २०१७.**

**परिशिष्ट - "ब"**

**उपयोगिता प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. **नाक्षेवि-२०१७/प्र.क्र.४३/का.९, दि. ३१ मार्च, २०१७** अन्वये वितरित केलेला रू. (अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)
२. मोजणी पुस्तके (Measurement Books)
३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)
४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

***********